सार्वजनिक बांधकाम विभागातील कामांच्या
निविदा सूचनांना वेबसाईटवर प्रसिध्दी
देण्याबाबत

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांक : निविदा ०७९९/प्र.क्र.२५६/इमारती-२
मंत्रालय, मुंबई ३२
दिनांक :- १ जानेवारी २००१

संदर्भ :- शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग क्रमांक निविदा ०७९९/प्र.क्र.२५६/इमारती-२, दिनांक २७/१०/१९९९.

सार्वजनिक बांधकाम विभागातील रु.५० लक्ष आणि त्यापेक्षा अधिक अंदाजित किंमतीच्या सर्व कामांच्या निविदा सूचना सार्वजनिक बांधकाम विभागाच्या "www.pwd maharashtra. gov.in" ह्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्याबाबतचे आदेश संदर्भाधीन शासन निर्णयाद्वारे निर्गमित करण्यात आले आहेत. उपरोक्त आदेश अधिक्रमित करुन आता खालीलप्रमाणे सुधारित आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

**शासन निर्णय :-**

१) सार्वजनिक बांधकाम विभागातील रु.५ लक्ष आणि त्याहून अधिक अंदाजित किंमतीच्या सर्व कामांच्या निविदा सूचना व शुध्दिपत्रके सार्वजनिक बांधकाम विभागाच्या "www.mahapwd. com" ह्या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात याव्यात.

२) वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात येणाऱ्या प्रत्येक निविदा सूचनेसाठी/शुध्दिपत्रकासाठी रु.५००/- (रुपये पाचशे फक्त) इतक्या रकमेचा धनादेश संबंधित विभागीय कार्यालयांनी "कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे" यांच्या नावाने पाठवावा.

३) निविदा सूचना वेबसाईटवर प्रसिध्द न केल्यास निविदा प्रसिध्दीची प्रक्रिया पूर्ण झालेली आहे, असे मानण्यात येणार नाही व त्यास संबंधित अधिकाऱ्यांस जबाबदार धरण्यात येईल. निविदा सूचना वेबसाईटवर प्रसिध्द झाली आहे, याबाबत विभागीय लेखाधिकारी यांनी खातरजमा केल्याशिवाय तसेच वेबसाईटवर निविदा सूचना उपलब्ध असल्याशिवाय कोऱ्या निविदा प्रपत्रांची विक्री करु नये.

त्याचप्रमाणे वरील बाबी वेबसाईटवर प्रसिद्ध झाली असल्याची संबंधित अधिकाऱ्यांकडून लेखी प्रमाणपत्राद्वारे खात्री केल्याशिवाय निविदा स्वीकारण्यास सक्षम असलेल्या अधिकाऱ्यांनी निविदा उघडू नये वा स्वीकारु नये.

४) उपरोक्त आदेश तात्काळ अमलात येतील. तसेच उपरोक्त परिच्छेद क्रमांक २ मधील आदेश ह्यापूर्वी ज्या कामांच्या निविदा सूचना वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आल्या आहेत त्यांचेसंदर्भातही लागू राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(शि. वि. तामखडे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत :

सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व मुख्य अभियंता/अधीक्षक अभियंता/कार्यकारी अभियंता,

सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग ह्यांचे स्वीय सहाय्यक,

सचिव (बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग ह्यांचे स्वीय सहाय्यक,

मुख्य अभियंता व सह सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय ह्यांचे स्वीय सहाय्यक,

आंतर वित्तीय सल्लागार व उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, ह्यांचे स्वीय सहाय्यक,

सर्व तांत्रिक अधिकारी, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय,